राज्यातील आदर्श शाळा म्हणून विकसित करावयाच्या स्थानिक स्वराज्य संस्थांच्या शाळांना मोठ्या बांधकामांसाठी निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०२२ /प्र.क्र.५४/एसडी-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २९ मार्च, २०२३

**वाचा :-** १) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग ,शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०२०/प्र.क्र.१४३ /एसडी-६, दि.५ मार्च, २०२१,
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग ,शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०२१/प्र.क्र.१८४ /एसडी-६, दि.४ फेब्रुवारी, २०२२,
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि. १६ मार्च, २०२३,
४) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग ,शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०२२/प्र.क्र.५४ /एसडी-६, दि.१३ मे, २०२२,
५) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग ,शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०२२/प्र.क्र.५४ /एसडी-६, दि.२७ जून, २०२२,

**प्रस्तावना –**

राज्यातील स्थानिक स्वराज्य संस्थांच्या शाळा, पूर्वीच्या महाराष्ट्र आंतरराष्ट्रीय शिक्षण मंडळाच्या ८१ शाळा, कस्तुरबा गांधी बालिका विद्यालय, शासकीय विद्यानिकेतने व नागरी भागातील शाळा यांचा समावेश करून ४८८ शाळा आदर्श शाळा म्हणून विकसित करण्याचा निर्णय संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे. वाचा येथील ४ व ५ या शासन निर्णयान्वये त्यापैकी ३२८ शाळांच्या मोठ्या बांधकामासाठी रू. १२५.४० कोटी निधी वितरीत करण्यात आला असून, उर्वरीत निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यात राबविण्यात येणाऱ्या आदर्श शाळा योजनेतील प्राथमिक व उच्च प्राथमिक २६७ शाळा व माध्यमिक व उच्च माध्यमिक ६१ शाळा अशा एकूण ३२८ शाळांच्या मोठ्या बांधकामांसाठी रू. ५८.२४ कोटी निधी खालील तक्यात दर्शविल्याप्रमाणे वितरीत करण्यात येत आहे.

(रू. कोटीत)

| वित्तीय वर्ष | लेखाशिर्ष | अर्थसंकल्पीत तरतुद | सुधारीत अंदाज | यापुर्वी वितरीत तरतुद | सदर शासन निर्णयान्वये वितरीत तरतूद |
|---|---|---|---|---|---|
| २०२२-२३ | मागणी क्र. ई-४, ४२०२, शिक्षण, क्रीडा, कला व संस्कृती यावरील भांडवली खर्च, ०१ सर्वसाधारण शिक्षण, २०१प्राथमिक शिक्षण, (००) (०३) राज्यात आदर्श शाळा विकसित करणे, ५३ मोठी बांधकामे ( ४२०२६४९८ )(कार्यक्रम) | १७०.८० | ११९.६४ | ८५.४० | ३४.२४ |
| २०२२-२३ | मागणी क्र. ई-४, ४२०२, शिक्षण, क्रीडा, कला व संस्कृती यावरील भांडवली खर्च, ०१ सर्वसाधारण शिक्षण, २०२ माध्यमिक शिक्षण, (००) (०९) राज्यात आदर्श शाळा विकसित करणे, ५३ मोठी बांधकामे (४२०२६५०४) (कार्यक्रम) | ८०.०० | ६४.०० | ४० | २४.०० |
| **एकूण** | | २५०.८० | १८३.६४ | १२५.४० | ५८.२४ |

३. उपरोक्त प्रमाणे वितरित निधी संदर्भ क्रमांक ४ व ५ येथील शासन निर्णयान्वये यापूर्वी ज्या शाळांकरिता वितरित करण्यात आला आहे, त्या शाळांच्या उर्वरित मोठ्या बांधकामाकरिता प्राथम्याने खर्च करण्यात यावा.

४. शाळांच्या मोठ्या बांधकामावरील खर्च **मागणी क्र. ई-४, ४२०२, शिक्षण, क्रीडा, कला व संस्कृती यावरील भांडवली खर्च, ०१ सर्वसाधारण शिक्षण, २०१प्राथमिक शिक्षण, (००) (०३) राज्यात आदर्श शाळा विकसित करणे, ५३ मोठी बांधकामे ( ४२०२६४९८ )(कार्यक्रम) व मागणी क्र. ई-४, ४२०२, शिक्षण, क्रीडा, कला व संस्कृती यावरील भांडवली खर्च, ०१ सर्वसाधारण शिक्षण, २०२ माध्यमिक शिक्षण, (००) (०९) राज्यात आदर्श शाळा विकसित करणे, ५३ मोठी बांधकामे (४२०२६५०४) (कार्यक्रम)** या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. सदर निधी खर्च करण्यासाठी आयुक्त (शिक्षण) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषीत करण्यात येत आहे. तर लेखाधिकारी, प्राथमिक शिक्षण संचालनालय,महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषीत करण्यात येत आहे.

५. सदर मोठी बांधकामे समग्र शिक्षा, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद,मुंबई यांच्या क्षेत्रीय स्तरावरील यंत्रणेमार्फत करण्यात यावीत.

७. आयुक्त ( शिक्षण ) यांनी सदर बांधकामावरील खर्चाचा वेळोवेळी आढावा घ्यावा.

८. सदर खर्च करताना वित्तीय नियमावली तसेच शासनाने वेळोवेळी दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

९. सदर शासन निर्णय नियोजन विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.१५३८/१४७१,दि.२४.०३.२०२३ व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.३८०/व्यय-५,दि.२७.०३.२०२३अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३२९१९०५०८४९२१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

IMTIYAZ
MUSHTAQUE KAZI

Digitally signed by IMTIYAZ MUSHTAQUE KAZI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT,
2.5.4.20=39a40419de755c2eab61fb555b2fdf8c8d6d652ff18fdffbd9c748ab01f6da04, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=77A529748C5E7C1BA7A66E81C654BA3C492FDA5B29E076241DB1BA213DDEDF4E, cn=IMTIYAZ MUSHTAQUE KAZI
Date: 2023.03.29 19:10:28 +05'30'

**( इ. मु. काझी )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राज भवन, मुंबई,
२. मा. अध्यक्ष/उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधान सभा, विधान भवन, मुंबई,
३. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय मुंबई
४. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय मुंबई
५. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधान परिषद, विधान भवन ,मुंबई,
६. मा. विरोधी पक्षनेता,महाराष्ट्र विधान सभा,विधान भवन, मुंबई,
७. मा. मंत्री, ( शालेय शिक्षण ) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय मुंबई
८. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग, मंत्रालय मुंबई

९. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे,
१०.राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई,
११.संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र, पुणे,
१२.शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१३.शिक्षण संचालक (प्राथमिक), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१४. संचालक (योजना), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१५.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,
१६.सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक,
१७.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
१८.संचालक, बालभारती,पुणे,
१९.सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक/योजना),
२०.सर्व प्रशासकीय अधिकारी/शिक्षणाधिकारी, महानगरपालिका,
२१.प्राचार्य, जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था (सर्व),
२२.सर्व जिल्हा कोषागारे,
२३.सर्व शिक्षण निरीक्षक,बृहन्मुंबई,
२४.निवड नस्ती (एसडी-६).